अनाथ लहान मूल दत्तक घेणा-या राज्य शासकीय महिला कर्मचा-यांना "विशेष रजा" मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वित्त विभाग,

शासन निर्णय क्रमांक अरजा-2495/26/सेवा-9,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 26 ऑक्टोबर 1998.

शासन निर्णय

अनाथ लहान मूल दत्तक घेणा-या राज्य शासकीय महिला कर्मचा-यांना "विशेष रजा" मंजूर करण्याचा प्रश्न राज्य शासनाच्या विचाराधीन होता. अनाथ लहान मूल दत्तक घेणा-या मातेलाही नैसर्गिक मातेप्रमाणे दत्तक मुलाचे संगोपन करावे लागते आणि सुरुवातीच्या कालावधीत दत्तक मुलाला नवीन वातावरणाची सवय व्हावी म्हणून मुलाच्या सोबतही रहावे लागते. या बाबी विचारात घेऊन शासनाने आता अनाथ लहान मूल दत्तक घेणा-या कायम सेवेतील किंवा दोन वर्षे सतत सेवा झाली आहे अशा राज्य शासकीय महिला कर्मचा-यांना "विशेष रजा" मंजूर करण्याचा निर्णय घेतला आहे. ही "विशेष रजा" खालील शर्तींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येईल.

(1) शासनमान्य अनाथालय/संस्था यामधून तीन वर्षांपेक्षा कमी वयाचे आणि अनाथ असलेले मूल दत्तक घेतलेले असावे.

(2) मूल दत्तक घेण्यासंबंधातील कायदेशीर कागदपत्रे सादर करणे आवश्यक राहील.

(3) "विशेष रजा" 90 दिवसांपर्यन्त अनुज्ञेय राहील आणि मूल दत्तक घेण्याच्या दिनांकापासून 90 दिवस किंवा मुलाचे वय तीन वर्षे पूर्ण होईल तो दिनांक यापैकी जो अगोदरचा दिनांक येईल त्या दिनांकापर्यन्तच्या कालावधीसाठी अनुज्ञेय राहील.

(4) संपूर्ण सेवेच्या कालावधीत ही रजा एकदाच अनुज्ञेय राहील.

(5) फक्त स्वतःचे मूल नसलेल्या महिला कर्मचा- यांनाच ही रजा अनुज्ञेय राहील.

2. हे आदेश मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्थांच्या प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा आणि कृषि व बिगर कृषि विद्यापीठे व त्यांना संलग्न असलेली महाविद्यालये यांमधील पूर्णकालिक शिक्षक व शिक्षकेतर महिला कर्मचारी यांनाही लागू होतील.

3. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

4. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 मध्ये आवश्यक त्या सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अनिल राजाध्यक्ष,
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

(पृ.मा.प.)

शासमु-रोटा-विवि-एच-957(15000-10-10-98)

प्रति

महालेखापाल–1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल–2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल–1 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल–2 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (520 प्रती),
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* संह संचालक, ऑल इंडिया इन्स्टिटयूट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट, मुंबई,
उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजन विभाग, मंत्रालय, मुंबई (20 प्रती),
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (20 प्रती),
ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (20 प्रती),
नगरविकास विभाग, यूडी–10, मंत्रालय, मुंबई (20 प्रती),
कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (20 प्रती),
सहकार व वस्त्रोद्योग विभाग (20 प्रती),
आदिवासी विकास विभाग (20 प्रती),
महिला व बालकल्याण विभाग (10 प्रती),
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे-रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय(व्यय विभाग), खोली क्र. 261, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे/नागपूर/औरंगाबाद/अमरावती/नाशिक/कोकण विभाग, कोकण, भवन, नवी मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, नवी मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (25 प्रती),
उच्च शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (25 प्रती),
कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (40 प्रती),
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई (100 प्रती),
संचालक, तांत्रिक प्रशिक्षण, व्दारा – तंत्र शिक्षण संचालक, मुंबई (250 प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी 10 प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी 10 प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी,
आयुक्त, महानगरपालिका, नागपूर,
प्रशासकीय अधिकारी, पश्चिम महाराष्ट्रातील नगरपालिका शिक्षण मंडळे, (पुणे/कोल्हापूर/सोलापूर या महानगरपालिकांची शिक्षण मंडळे यांसह),
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका,
कार्यकारी अधिकारी कॅण्टोन्मेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक (10 प्रती),
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे (10 प्रती),
संचालक, आदिवासी संशोधन व शिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य,
आदिवासी विकास आयुक्त, नाशिक,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
अपर आयुक्त, आदिवासी उपयोजना नाशिक/नागपूर,
सर्व समाजकल्याण अधिकारी वर्ग–1,
सर्व आदिवासी कल्याण अधिकारी,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिकृत आदिवासी विकास प्रकल्प,
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला,
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई,
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे,
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर,
कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर,
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती,
कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
अधीक्षक, वेतन पथक, सर्व जिल्हे,
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई (उत्तर, दक्षिण व पश्चिम विभाग),
सर्व कन्याशाळा निरीक्षिका,
सर्व जिल्ह्यांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग),
शिक्षण अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका,
संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
सर्व प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा–9.

---

* पत्राव्दारे.

1998 चा क्रमांक
माहिती व मार्गदर्शनाकरिता प्रत रवाना.

एच–957(15000+10–10–98)अ.